**अकोला महानगरपालिका स्थायी समिती पारित ठराव क्र.०३ दिनांक २१/०९/२०१६ महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम कलम ४५१ (३) अन्वये अंतिमत: विखंडीत करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- अकोला-२०१६/प्र.क्र.१२०/नवि-२६**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :-१२ एप्रिल, २०१७

वाचा :-१) आयुक्त, अकोला महानगरपालिका यांचे पत्र क्र.अमनपा/साप्रवि/आस्था/५०५/२०१६, दिनांक ०१/१०/२०१६

२) शा.नि.समक्रमांक दि.०६/०१/२०१७

३) सभापती, स्थायी समिती, अकोला महानगरपालिका यांचे पत्र क्र.अमनपा/ स्थासस/ १७९/ २०१७ दि.०२/०२/२०१७

४) आयुक्त, अकोला महानगरपालिका यांचे पत्र क्र.अमनपा/साप्रवि/आस्था/८९८/२०१७, दिनांक ०४/०२/२०१७

**प्रस्तावना :-**

आयुक्त, अकोला महानगरपालिका यांच्या संदर्भाधीन क्र.०१ येथील पत्रान्वये केलेल्या विनंतीस अनुलक्षून अकोला महानगरपालिका, स्थायी समिती ठराव क्र.०३ दिनांक २१/०९/२०१६ हा संदर्भाधीन क्र.०२ येथील शासन निर्णयान्वये तात्पुरता निलंबित करण्यात आलेला आहे. या संदर्भाधीन क्र.०२. येथील शासन निर्णयात नमूद केल्यानुसार आयुक्त, अकोला महानगरपालिका अमरावती यांनी संदर्भाधीन क्र.०४ येथील पत्रान्वये व सभापती, स्थायी समिती, अकोला महानगरपालिका यांनी संदर्भाधीन क्र.०३ येथील पत्रान्वये त्यांचे अभिवेदन सादर केलेले आहे.

या अनुषंगाने अकोला महानगरपालिका प्रशासन हे संदर्भाधीन क्र.०१ येथील पत्रान्वये पाठविण्यात आलेल्या भूमीकेशी आजही ठाम असल्याचे आयुक्त, अकोला महानगरपालिका यांनी संदर्भाधीन क्र.०४ येथील पत्रान्वये कळविले आहे. तसेच केंद्र शासनाने स्वीकारलेले No Work No Pay हे धोरण तसेच या धोरणाच्या अनुषंगाने मा.सर्वोच्च न्यायालयाने अनेक प्रकरणात वेळोवेळी घेतलेल्या भूमिका या पार्श्वभूमीवर, अकोला महानगरपालिकेच्या स्थायी समितीने पारित केलेला ठराव क्र.०३ दि.२१/०९/२०१६ हा महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील प्रकरण अठ्ठावीस कलम ४५१ (३) नुसार अंतिमत: विखंडीत करण्याचा निर्णय घेण्याचा प्रस्ताव शासनस्तरावर विचाराधीन होता. त्याअनुषंगाने पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.:-

**शासन निर्णय :-**

अकोला महानगरपालिका स्थायी समितीने पारित केलेले ठराव क्र.०३ दि.२१/०९/२०१६ हा महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाचे कलम ४५१ (३) नुसार अंतिमत: विखंडीत झाल्याचे मानण्यात येत आहे.

०२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४१२१६३७०६८३२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षंकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Yoge Shashikant Narhari

Digitally signed by Yoge Shashikant Narhari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=88b7261ec236df5e51055c4e56e97c2ea6823e6595d110ff293acdf173898c9d, cn=Yoge Shashikant Narhari
Date: 2017.04.12 16:40:12 +05'30'

**( शशिकांत योगे )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा.महापौर, अकोला महानगरपालिका, अकोला, द्वारा आयुक्त, अकोला महानगरपालिका, अकोला
२) मा.सभापती, स्थायी समिती, अकोला महानगरपालिका, अकोला, द्वारा आयुक्त, अकोला महानगरपालिका, अकोला
३) आयुक्त, अकोला महानगरपालिका, अकोला.
४) सचिव (नवि-२) यांचे वि.का.अ.
५) सह सचिव (नवि-२६), नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) निवडनस्ती, कार्यासन नवि-२६.